" मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत " अनु.जाती/ अनु. जमाती/ दारिद्र्य रेषेखालील बाळंत महिलेला बुडीत मजूरी देणे " या आरोग्य विषयक योजनेमध्ये "अमरावती व भंडारा "या दोन जिल्ह्यांतील तालुक्यांचा समावेश करणेबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन निर्णय क्र.:- माविका -२०२१/प्र.क्र. ३६ /का.१४१८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय,मुंबई ४०००३२.
दिनांक:- २८ ऑक्टोबर,२०२१.

वाचा - १) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८,दि.१९ जुलै,२०११.
२) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका-२०१२/प्र.क्र.६९/का.१४१८,दि.१२ जुलै,२०१२.
३) नियोजन विभाग, शासन निर्णय क्र.माविका-२०११/प्र.क्र.१०८/का.१४१८,दि.१७ फेब्रुवारी,२०१४.
४) सार्वजनिक आरोग्य विभाग, शासन निर्णय क्र. मासका-२०१७/प्र.क्र.४९३/कुक, दि. ८ डिसेंबर, २०१७

प्रस्तावना -

नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८ दि. १९ जुलै, २०११ अन्वये "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत निवडलेल्या २३ जिल्ह्यांतील १२५ तालुक्यांमध्ये विविध कार्यक्रम राबविण्यात येत आहेत. तसेच नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका-२०१२/प्र.क्र.६९/का.१४१८, दि. १२ जुलै, २०१२ अन्वये "मानव विकास कार्यक्रम" सन २०१२-१३ पासून २३ जिल्ह्यातील १२५ तालुक्यातील “क” वर्ग नगरपालिकांमध्ये राबविण्यात येत आहे.

२. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८ दि. १९ जुलै, २०११ अन्वये "मानव विकास कार्यक्रम " अंतर्गत राबविण्यात येत असलेल्या आरोग्यविषयक योजनांमध्ये **"अनु.जाती/ अनु.जमाती/दारिद्र्य रेषेखालील बाळंत महिलेला बुडीत मजूरी देणे”** या योजनेचा समावेश आहे. या वर्गातील महिलांची आर्थिक परिस्थिती एकंदरीत नाजूक असल्याने त्यांना गर्भवती असतांनाही कामावर जावे लागते. त्यामुळे त्यांची व अर्भकाची आबाळ होते व इतर समस्या उद्भवतात. ह्या बाबींचा विचार करून गर्भवती महिलांना किमान विश्रांती मिळावी यासाठी " अनु.जाती/ अनु. जमाती/ दारिद्र्य रेषेखालील बाळंत महिलेला बुडीत मजूरी देण्यात येते . या योजनेंतर्गत लाभार्थी बाळंत महिलेस बुडीत मजूरीची रक्कम ₹ २०००/- इतकी वाढविण्याबाबतचा निर्णय नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविका-२०११/प्र.क्र.१०८/का.१४१८, दि.१७ फेब्रुवारी, २०१४ अन्वये घेण्यात आला आहे. **"अनु.जाती/अनु.जमाती/ दारिद्र्य रेषेखालील बाळंत महिलेला बुडीत मजूरी देणे”** या योजनेअंतर्गत महिलेला प्रसुतीपूर्वी आठव्या किंवा नवव्या महिन्यात ₹ २०००/- व प्रसुतीनंतर एका महिन्याच्या आत ₹ २०००/- याप्रमाणे विभागून देण्यात येत आहेत.

३. नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८ दि. १९ जुलै, २०११ अन्वये "मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत निवडलेल्या २३ जिल्ह्यांतील १२५ तालुक्यांमध्ये विविध कार्यक्रम राबविण्यात येत असले तरीही "अमरावती व भंडारा" या दोन जिल्ह्यात केंद्र शासन मार्फत त्यावेळी राबविण्यात येणा-या

"इंदिरा गांधी मातृत्व सहयोग" या योजनेअंतर्गत बाळंत महिलेस "बुडीत मजूरी " देण्यात येत होती, त्यामुळे बाळंत महिलेस दुहेरी लाभ होणार नाही या दृष्टीने (i) अमरावती जिल्ह्यातील "चिखलदरा व धारणी" असे २तालुके व (ii) भंडारा जिल्ह्यातील "लाखांदूर, मोहाडी, तुमसर, लाखनी व साकोली" असे ५ तालुके"मानव विकास कार्यक्रम" अंतर्गत "अनु.जाती/अनु.जमाती/दारिद्र्य रेषेखालील बाळंत महिलेला बुडीत मजूरी देणे" या आरोग्य विषयक योजनेतून वगळण्यात आले होते. कालातंराने "इंदिरा गांधी मातृत्व सहयोग" ही "केंद्र पुरस्कृत योजना" बंद होऊन केंद्र पुरस्कृत "पंतप्रधान मातृ वंदना" ही नवीन योजना लागू झाल्यामुळे या दोन जिल्ह्यांतील महिला दुस-या व त्यापुढील अपत्यासाठीच्या बुडित मजूरीच्या लाभापासून वंचित आहेत. यास्तव "मानव विकास कार्यक्रमा"अंतर्गत "अनु.जाती/अनु.जमाती/दारिद्र्य रेषेखालील बाळंत महिलेला बुडीत मजूरी देणे" या आरोग्य विषयक योजनेमध्ये (i) अमरावती जिल्ह्यातील "चिखलदरा व धारणी" असे २तालुके व (ii) भंडारा जिल्ह्यातील "लाखांदूर, मोहाडी, तुमसर, लाखनी व साकोली" असे ५तालुके समाविष्ट करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

नियोजन विभाग, शासन निर्णय क्र. माविमि-२०१०/प्र.क्र.८१/का.१४१८, दि. १९ जुलै, २०११ अन्वये "मानव विकास कार्यक्रमा" अंतर्गत राबविण्यात येत असलेल्या "अनु.जाती/अनु.जमाती/ दारिद्र्य रेषेखालील बाळंत महिलेला बुडीत मजूरी देणे" या आरोग्य विषयक योजनेमध्ये (i) अमरावती जिल्ह्यातील " चिखलदरा व धारणी " असे २तालुके व (ii) भंडारा जिल्ह्यातील "लाखांदूर, मोहाडी,तुमसर, लाखनी व साकोली" असे ५तालुके समाविष्ट करण्यात येत आहेत .

२. नियोजन विभागाचा हा शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. अनौसं. क्र. ४०२/२०२१/व्यय-८ दि. ६/१०/२०२१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर हा शासन निर्णय उपलब्ध करण्यात आला असून ; त्याचा संगणक संकेताक २०२११०२८१५३७०५८८१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vanita Narayan Jadhav

Digitally signed by Vanita Narayan Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=2f0e1884948542877a779b797fc357f1c34d84fe1aa3f9bdc30c060e0431223f, cn=Vanita Narayan Jadhav
Date: 2021.10.28 17:26:31 +05'30'

**( वनिता ना. जाधव )**
**कक्ष अधिकारी ,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपालांचे सचिव
२) मा. मुख्यमंत्री यांचे सचिव
३) मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे सचिव
४) मा. मंत्री/ राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव
५ ) मा. कार्यकारी अध्यक्ष, राज्य नियोजन मंडळ, नवीन प्रशासकीय भवन, १८ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई-३२.
६) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा ), मुंबई/नागपूर , महाराष्ट्र-१/२

७) शासनाचे मुख्य सचिव.
८) शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव,
९) आयुक्त (मानव विकास ),मानव विकास आयुक्तालय, औरंगाबाद
१०) विभागीय आयुक्त (सर्व)
११) जिल्हाधिकारी (सर्व)
१२) मुख्य कार्यकारी अधिकारी (सर्व)
१३) संचालक ,अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई
१४) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र शासन, मुंबई
१५) अधिदान व लेखा अधिकारी, महाराष्ट्र शासन, मुंबई
१६) उपायुक्त, नियोजन, विभागीय आयुक्त कार्यालय (सर्व)
१७) जिल्हा नियोजन अधिकारी (सर्व)
१८) गट विकास अधिकारी, पंचायत समिती (सर्व)
१९) संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
२०) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प (सर्व)
२१) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२२) सह सचिव / उप सचिव (व्यय-८), वित्त विभाग, मंत्रालय
२३) नियोजन विभागातील सर्व सह सचिव / उप सचिव
२४) निवड नस्ती (का.१४१८)